# पुनर्जन्म खरा आहे काय?

# पुनर्जन्म एक भाकडकथा आहे

डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? भाग 5

E Book 170

प्राचार्य अद्वयानंद गळतगे,भोज ५९१ २६३. जिल्हा बेळगाव. कर्नाटक.

भ्र. ९९०२००२५८५

## पुनर्जन्म खरा आहे काय?

भौतिकवादानुसार,जो विज्ञानाच्या, मुख्य प्रवाहातील वाद आहे - मनुष्य मेल्यानंतर संपतो. त्यामुळे 'पुनर्जन्म खरा आहे काय'?

हा प्रश्नच विज्ञानाच्या त्या वादानुसार निर्माण होत नाही. जर कोणी तो प्रश्न निर्माण केलाच तर 'ती एक भाकडकथा आहे' हे ह्या विज्ञानवादाचे उत्तर ठरलेले आहे. तथापि पुनर्जन्माच्या प्रश्नाविषयी थोरो या प्रसिद्ध फ्रेंच विचारवंताने एक मार्मिक विधान केले असून ते या भौतिक विज्ञानवादाला आव्हान देणारे आहे. थोरों ते विधान असे : 'It is no more surprising to be born twice than to be born once, म्हणजे" (माणसाचे एकदा (पहिल्यांदा) जन्मणे हे जितके आश्चर्यकारक आहे, तितके त्याचे दोनदा (दुसऱ्यांदा) जन्मणे (पुनर्जन्म होणे) हे आश्चर्यकारक नाही." त्याने असे म्हणण्याचे कारण माणसाच्या पुनर्जन्माविरुद्ध आक्षेप घेणाऱ्या जडवादी शास्त्रज्ञांना माणसाच्या एकदा (पहिल्यांदा) जन्म घेण्याचेच गुढ उकलला आलेले नाही. त्याची समस्या सोडवला आलेली नाही. तरीही त्याच्या दुसऱ्यांदा जन्मण्याच्या

(पुनर्जन्माच्या) विरुद्ध ते आक्षेप घेत असतील तर त्यांचा तो आक्षेप अज्ञानमूलक ठरतो, हे थोरोच्या वरील विधानातून सूचित होते.

भौतिकवादी शास्त्रज्ञांना माणसाचा जन्म कुठून होतो, का होतो, तो माणूस जन्मण्यापूर्वी कुठे होता इ. प्रश्नांची उत्तरे देता आलेली नाहीत व जड (भौतिक) नियमानुसार ती मुळीच देता येत नाहीत ही वस्तुस्थिती आहे. कारण माणूस जन्मतो ते एक व्यक्तिमत्व (person) म्हणून, आणि ही वस्तुस्थिती कोणीही नाकारत नाही ती वादातीत आहे. तसेच हेही वादातीत आहे की जन्मलेल्या माणसाच्या व्यक्तिमत्वासारखे व्यक्तिमत्व (personality) जगात दुसऱ्या कोणत्याच व्यक्तीचे नसते. म्हणजेच त्या माणसाचे ते व्यक्तिमत्व अद्वितीय (unique) असते. अशा रीतीने अद्वितीय असलेली ती व्यक्ती मुळात कुठून जन्म घेते? म्हणजे ती जन्मण्यापूर्वी कोठे होती व ती का जन्म घेते हे प्रश्न साहजिकच निर्माण होतात. भौतिक (जडवादीशास्त्रज्ञ ती व्यक्ती शून्यातून म्हणजे जडातून जन्मली, म्हणजेच जन्मण्यापूर्वी ती अस्तित्वातच नव्हती असे काही म्हणू शकत नाहीत, कारण तिला जन्म देणारे मातापिता शून्य किंवा जड नाहीत व ती व्यक्तीही नाहीत. म्हणजेच त्या जन्मलेल्या व्यक्तिमत्वाहून भिन्न व्यक्तिमत्वाच्या त्या व्यक्ती आहेत. अशारितीने शून्यातून वा जडातून निर्माण न झालेली व तिला जन्म देणाऱ्या मातापित्यांच्या व्यक्तिमत्वाहून भिन्न व्यक्तिमत्व असलेली ती व्यक्ती त्या मातापित्यांच्या पोटी जन्म घेण्यापूर्वी कोठे होती व ती त्या विशिष्ट मातापित्यांच्या पोटी का वा कशी जन्मली, हे प्रश्न साहजिकच निर्माण होत असून या प्रश्नांची उत्तरे जड (भौतिक) नियमानुसार देऊ न शकणारे भौतशास्त्रज्ञ पुनर्जन्माविरुद्ध आक्षेप कसा घेतात, त्याला भाकडकथा कसे म्हणतात, असा प्रश्न थोरोच्या वरील विधानातून उपस्थित होतो. वरील प्रश्नांची उत्तरे देता येत नसतानाही जडवादी शास्त्रज्ञ पुनर्जन्माविरुद्ध आक्षेप घेत असतील, त्याला भाकडकथा म्हणत असतील, तर ते ज्या भौतिक विज्ञानाच्या जड (आंधळ्या) नियमांवर विश्वास ठेवून हा आक्षेप घेतात, त्या जड वा आंधळ्या नियमांप्रमाणे तेही (बुद्धीने) जड वा आंधळेच आहेत असे म्हटले तर ते चुकीचे ठरेल काय? [ती व्यक्ती गुणसूत्रे वा जनुके (genes) यांच्या अणुसंघातातून म्हणजे जडातून निर्माण झाली

असे ते शास्त्रज्ञ म्हणू शकत नाहीत, याचे कारण या जड अणुसंघातातून मन, बुध्दी, अहंकार (मी ची जाणीव) कसे निर्माण होतात हे ते जड़ नियमांच्या आधारे सांगू शकत नाहीत, हे आहे. मग त्यापासून आत्मा (जीवात्मा) कसा निर्माण होतो हे सांगण्याची गोष्टच दूर! कारण दृष्य शरीर नष्ट झाले तरी अदृष्य आत्मा नष्ट होत नाही, याचे पुरावे आहेत व ते आपण मागे पाहिले आहेत; आणि आत्मा (जीवात्मा) हाच व्यक्तीच्या म्हणजे स्वतंत्र व्यक्तिमत्वाच्या रूपाने पुनःपुन्हा जन्म घेत असतो]

## माणसाचा जन्म माकडापासून झाला?

मी वर म्हटले आहे की भौतिकवादी शास्त्रज्ञांना माणसाचा जन्म कुठून होतो, का होतो या प्रश्नांची उत्तरे भौतिक नियमांच्या आधारे देता येत नाहीत, ही वस्तुस्थिती आहे. थोरोने सुचविल्याप्रमाणे माणसाच्या पुनर्जन्माचे म्हणजे दुसऱ्यांदा जन्मण्याचे गूढ आहे हे खरे तर त्याच्या एकदा म्हणजे पहिल्यांदा जन्मण्याचेच गूढ आहे. म्हणजे पहिल्यांदा

माणूस कुठून व कसा जन्मला हेच खरे गूढ आहे, हाच खरा प्रश्न आहे. एकदा जन्मलेला माणूस पुनःजन्मणे (त्याचा पुनर्जन्म होणे) तत्वतः व व्यवहारतः अशक्य नाही. म्हणजे ते गूढ नाही. आता डार्विनचा उत्क्रांतिवाद सांगतो की माणूस प्रथमत: शेपूट नसलेल्या माकडापासून (ape) जन्मला. त्यावर शेपूट नसलेले माकड कशापासून जन्मले व ते ज्याच्यापासून जन्मले 'ते' कशापासून जन्मले असे डार्विनच्या भौतिक उत्क्रांतिवादानुसार एकामागून एक प्रश्न निर्माण होतात. व ही प्रश्नमालिका शेवटी पृथ्वीवर पहिला जीव कशापासून जन्मला या मूळ प्रश्नाला येऊन ठेपते.

या मूळ प्रश्नाचे समर्पक उत्तर जड (भौतिक) उत्क्रांतिवादाला जड नियमानुसार देता आले तरच माणसाचा जन्म माकडापासून झाला हे त्या वादाचे म्हणणे मान्य करता येईल. अर्थात पृथ्वीवर पहिला जीव हा जड अणूच्या संघातातूनच जन्मला असेच डार्विनच्या भौतिक उत्क्रांतिवादाला मानाने लागते. पण जड अणूंच्या संघातातून तो कसा जन्मला हे कोडे डार्विनच्या नैसर्गिक निवडीच्या (natural

selection) तत्वाच्या आधारे - ज्या तत्वाच्या आधारे माकड व माणूस यासह सर्व जीवजाती निर्माण झाल्याचे डार्विनचा उत्क्रांतिवाद सांगतो, त्या तत्वाच्याआधारे- सोडविता येत नाही, ही वस्तुस्थिती आहे. कारण डार्विनचे नैसर्गिक निवडीचे तत्व जीवनाच्या झगड्यात (struggle for existence) जे जीव समर्थ (लायक) ठरतात तेच टिकतात (survival of the fittest) असे सांगते. म्हणजे फक्त सजीवांना हे डार्विनचे नैसर्गिक निवडीचे तत्व लागू होते. जड (निर्जीव) अणूंच्या संघातांना नाही. कारण जर अणू वा त्यांचे संघात जगण्यासाठी झगडणे शक्य नाही. अशा रीतीने जड अणूंच्या संघातातून पृथ्वीवर पहिला जीव कसा निर्माण झाला हे कोडे नैसर्गिक निवडीच्यातत्वाच्या आधारे डार्विनचा भौतिक उत्क्रांतिवाद सोडविण्यास तत्वतःअसमर्थ आहे.




म्हणून डार्विनने या प्रश्नाची चर्चाच आपल्या ग्रंथात टाळली आहे. उदा तो म्हणतो, "How a nerve comes to be sensitive to light hardly concerns us more than how life itself originated” (Origin of Species -
Charles Darwin, 1962. P.179, Collier Books) म्हणजे “मज्जातंतू

प्रकाशाला कसा संवेदनाशील झाला हा प्रश्न पहिला जीव कसा निर्माण झाला या प्रश्नाप्रमाणेच आमच्याशी क्वचित्तच् सबंधित आहे.” त्याने असे म्हणण्याचे कारण पृथ्वीवरील पहिल्या जीवाच्या निर्मितीप्रमाणेच डोळ्याच्या निर्मितीचा प्रश्नही निसर्गनिवडीच्या तत्वाच्या आधारे सोडविता येत नाही, हे आहे; आणि डार्विनला हे उघडपणे मान्य करावे लागले आहे. उदा तो म्हणतो, ‘To suppose that the eye… could have been formed by natural selection seems, I freely confess, to be absurd in the highest degree’ (Origin.p.178) म्हणजे ‘डोळ्याची निर्मिती नैसर्गिक निवडीने झाली असे समजणे हा कमालीच्या मूर्खपणा आहे असे दिसते, हे मी मोकळेपणाने कबूल करतो.” असे असले तरी डोळ्याची निर्मिती कशी झाली असावी याविषयी त्याने थोडा तर्क केला आहे. पण पृथ्वीवरील पहिल्या जीवाची उत्पत्ती जडातून कशी झाली याविषयी मात्र त्याने कसलाच तर्क करण्याचे आपल्या ग्रंथात टाळले आहे. याचे कारण वर स्पष्ट केल्याप्रमाणे नैसर्गिक निवडीचे तत्व तेथे लागू होत नाही हे आहे. पण भौतिक उत्क्रांतिवादावर विश्वास ठेवणाऱ्या नवडार्विनवाद्यांना पृथ्वीवरील पहिल्या जीवाची उत्पत्ती जडातून कशी झाली हे कोडे सोडविण्याची जबाबदारी टाळता येत नाही. हे कोडे नैसर्गिक निवडीच्या तत्वाने सोडवता येत नसल्यामुळे भौतिक कार्यकारणभावाच्या नियमानुसार त्यानी ते सोडविले पाहिजे. पण भौतिक कार्यकारणभावाने- जो कार्यकारणभावस्थानिक स्वरूपाचा असल्याचे भौतवैज्ञानिक मानतात - ते कोडे त्यांना सोडविता आलेले नाही, ही वस्तुस्थिती आहे (पाहा: प्रस्तुत लेखकाच्या चार्वाकवाद आणि अध्यात्म या पुस्तकातील 'जीवोत्पत्तीःरूढ जीवशास्त्राला न सुटलेले कोडे’ हे प्रकरण) त्यांना ते भौतिक कार्यकारणभावाने सोडवता न येण्याचे कारण ज्या जडातून जीवोत्पत्ती झाली (असे ते मानतात) ते नियम त्या जडाच्या म्हणजेच जड विश्वाच्या उत्पपत्तीशी तो प्रश्न निगडित आहे व या संबंधांच्या वस्तुस्थितीकडे त्यांनी पूर्ण दुर्लक्ष्य केले आहे. त्यामुळे हे कोडे न सुटणारे बनले आहे. जडाच्या (जड विश्वाच्या) उत्पत्तीचे कोडे सोडविले की जडापासून झालेल्या जीवाच्या उत्पत्तीचे कोडेही आपोआपच सुटते, कारण ज्या जडाच्या

(भौतिक) नियमानुसार जिवाची उत्पत्ती झाली (असे ते मानतात) ते नियम व त्या जडाच्या (जड विश्वाच्या) उत्पत्तीचे नियम एकच असले पाहिजेत हे उघड आहे. म्हणजेच जड विश्वाच्या उत्पत्तीचे नियम व जड विश्वातून निर्माण झालेल्या जीवाच्या उत्पत्तीचे कोडे तात्विक भेद मानल्या मुळेच व ते नियम वेगळे मानल्यामुळेच, जीवाच्या
उत्पत्तीने कोडे न सुटणारे बनविले आहे, आणि आश्चर्य असे की स्वतः डार्विननेच ते कोडे न सुटणारे बनविले आहे. ते कसे ते पाहू.

## डार्विनचा अर्धजरतीय न्याय

डार्विन हे मान्य करतो की या विश्वाला निर्माणकर्ता आहे. (Creator हा विश्वनिर्माणकर्ता या अर्थाचा शब्द डार्विनने आपल्या ग्रंथात अनेकदा वापरला असून त्याचे आद्याक्षर तो नेहमी पहिल्या लिपीत ठेवतो, हे महत्वाचे आहे.) तसेच या जड विश्वातील जडाचे (भौतिक) नियम ईश्वरानेच निर्माण केले असल्याचेही तो मान्य करतो. (" the laws (are) impressed on matter by the Creator." Origin p.484) अशा रीतीने डार्विन जड पदार्थांच्या नियमांचे कर्तृत्व विश्वनिर्माणकर्त्या ईश्वरावर सोपवतो, पण जीवजातींच्या निर्मितीचे (origin of Species) कर्तृत्व मात्र तो ईश्वरावर न सोपवता जड पदार्थाच्या नियमांवर – जे नियम जड म्हणजे आंधळे असल्याचे गृहीत धरण्यात आले आहे, त्यावर- सोपवतो. यातील विरोध एक तर त्याच्या लक्षात आलेला नाही, किंवा यात विरोध आहे हे तरी त्याला मान्य नसावे. पण ते कसे कसेही असले तरी जो ईश्वर विश्वोत्पत्ती करू शकतो व डार्विनच्या मान्यतेप्रमाणे त्या विश्वातील जड पदार्थांचे नियमही निर्माण करू शकतो, तो ईश्वर जड पदार्थाच्या नियमातून जीव व जीवजाती निर्माण करण्याचे नियम निर्माण करू शकणार नाही काय? विश्वनिर्माणकर्त्या ईश्वराचे विश्वातील नियम बनविण्यामधील ही अर्धवट कर्तृत्व मानणारी डार्विनची कल्पना म्हणजे अर्धजरतीय न्याय आहे. म्हणजेच ईश्वरावरील अन्याय आहे. शिवाय ती तर्कदुष्टही आहे. एक तर

ईश्वर हा विश्वनिर्माणकर्ता असल्याचे मानायचे झाले तर त्या विश्वातील सर्व नियमांचे कर्तृत्व(‘विश्व’ याचा अर्थच ‘सर्व’ असा आहे) त्यालाच दिले पाहिजे, किंवा विश्वनिर्मितीचे कर्तृत्व ईश्वराला आहे हेच नाकारले पाहिजे, ज्याचा अर्थ ईश्वराचे (श्रेष्ठ आत्मत्त्वाचे) अस्तित्वच नाकारणे असा होतो. (आणि हल्ली नवनडार्विनवाद्यांनी उक्रांतिमध्ये ईश्वराचे अस्तित्वच पूर्णपणे नाकारून, म्हणजे पूर्णपणे जडवादी धोरण स्वीकारून, डार्विनची 'चूक सुधारली नाहे.) पण ते अस्तित्व नाकारता येत नाही असे खुद्द भौतिकविज्ञानातील क्वांटम मेकॅनिक्सचा सिध्दांतच सांगतो! कारण आपण पूर्वी पाहिले आहे की जड विश्वाचे अस्तित्व ईक्षण करणाऱ्याच्या (observer) चेतनाशिवाय (आत्म्याशिवाय) व्यावहारिक पातळीवर सिद्धच होत नाही आणि क्वांटम सिद्धांताचा प्रयोगसिद्ध निष्कर्ष आहे. (हा प्रयोग श्रोडिंजरचा ‘मांजराचा विरोधाभास’ Cat Paradox या नावाने प्रसिद्ध आहे. पाहाःQuantum Theory and Measurement -Ed. J. A. Wheeter & W.H.Zurek, 1983, pp.152-167) अशा रीतीने क्वांटम सिध्दांतामुळे (जो क्वांटम सिध्दांत, आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे, कोणत्याही भौतशास्त्रज्ञाला समजत नसल्याचे स्वतः एक भौतशास्त्रज्ञच म्हणतो)विश्वोत्पत्तीचे कोडे सुटते असे नाही तर प्राथमिक जीवाच्या उत्पत्तीचे कोडे त्यातून निर्माण झालेल्या विविध जीव जातीच्या उत्पत्तीचे कोडेही सुटते. पण त्यासाठी आंधळा जडवाद खोटा असल्याचा क्वांटम सिद्धांताचा निष्कर्ष, म्हणजेच विश्वातील भौतिक नियम आंधळे नसल्याचे क्वांटम सत्य स्वीकारण्याची जडवादाचा पूर्णपणे त्याग करण्याची भौतशास्त्रज्ञाप्रमाणेच जीवशास्त्रज्ञांनाही किंमत मोजावी लागणार आहे, ही किंमत फार मोठी असल्यामुळे [कारण 300 वर्षांचा भौतिकविज्ञानाचा जडवादी पायाच त्यामुळे उखडला जातो-(ती किंमत अशा रीतीने फार मोठी असल्यामुळेच क्वांटम सिध्दांत समजत नसल्याची पळवाट त्यांनी काढली आहे)] - ती मोजण्याची भौतशास्त्रज्ञांची तयारी नसल्याचे, त्यांच्या क्वांटम सिध्दांत समजत नसल्याच्या तक्रारातून (जसे आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे)दिसून येते, तसेच जीवाच्या जीवजातींच्या उत्पत्तीविषयीच्या नियमातील (क्वांटम सिध्दांत समर्थन करीत असलेल्या) चेतनाचे (आत्म्याचे ईश्वराचे)कर्तृत्व नाकारण्यातूनही (ती किंमत मोजण्याची) नवडार्विनवाद्यांचीदेखील तयारी नसल्याची दिसून येते. (याला काही

सन्माननीय अपवाद भौतशास्त्राप्रमाणे जीवशास्त्रातही अर्थातच आहेत. पण हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच. त्यांना जीव वादी (vitalists) म्हणून हिणवण्यात येते!) जडवाद सुखासुखी मरत नाही हेच खरे. तथापि क्वांटम सिध्दांतामूळे झालेला हा जडवादाचा (भौतिक आणि जीव शास्त्रातील) सैद्धांतिक मृत्यू असून स्वतः भौतशास्त्राने शोधलेल्या क्वांटम सिद्धांतामुळे ते घडून आला असल्यामुळे, तो मृत्यू नाकारणे म्हणजे खुद्द भौत शास्त्राला नाकारणे ठरते, जे ते अर्थातच नाकारू शकत नाहीत. अशा रीतीने खुद्द भौतशास्त्रच आपल्या क्वांटम सिद्धांताच्या शोधातून जडवाद (भौतिकवाद) खोटा असल्याचे सिद्ध करीत असून त्याचीच परिणती उत्क्रांतीतील डार्विनवादाच्या मृत्यूत झाली आहे. हा डार्विनवादाचा सैद्धांतिक मृत्यू आहे. डार्विनवादाचा सैध्दांतिक मृत्यू मॅडम ब्लॅव्हेट्स्की यांनी जादूरूपी अध्यात्मतत्वाच्या प्रयोगातून व पुराव्यातून डार्विनचा भौतिक उत्क्रांतिवाद खोटा असल्याचे दाखवून दिल्याचे आपण पहिल्या लेखात पाहिले आहे. तसेच परचित्तज्ञान, भूतभविष्यकालज्ञान, दूरवस्तूज्ञान इ. मनाच्या अतींद्रीय (आध्यात्मिक) शक्तीचे व मृतात्म्याच्या अस्तित्वाचे पुरावेही जडवाद व त्यावर आधारलेला डार्विनचा उत्क्रांतिवाद खोटा ठरवत असल्याचे दुसऱ्या व त्यानंतरच्या लेखातून आपण पाहिले आहे. आता पुनर्जन्माच्या सत्यतेचे पुरावे आपण पाहात आहोत, हे सर्व पुरावे डार्विनचा भौतिक उत्क्रांतिवाद खोटा असल्याचे तात्विकआणि व्यावहारिक अशा दोन पातळीवर सिध्द करतात. जे व्यावहारिक पातळीवर पुराव्यांच्या आधार खोटे ठरते, ते तात्विक (सैद्धांतिक) पातळीवर आपोआपच खोटे ठरते. जडवाद प्रत्यक्षपुराव्यांच्या आधारे खोटा ठरत असेल तर जडवादाच्या नियमानुसार उत्क्रांती झाली हे डार्विनवादाचे म्हणणे तात्विक (सैद्धांतिक) पातळीवर आपोआपच खोटे ठरते. डार्विनचा उत्क्रांतिवाद हा केवळ तात्विक पातळीवरील (सैद्धांतिक) वाद आहे हे लक्षात ठेवले पहिजे, तो पुराव्यावर वा प्ररत्यक्ष प्रयोगावर आधारलेला शास्त्रीय सिध्दांत नाही. कोणताही शास्त्रीय सिध्दांत प्रथम भाकित (prediction) करतो, ते भाकित नंतर प्रयोग व निरीक्षणाने खरे ठरले तरच तो सिध्दांत शास्त्रीय सत्य म्हणून स्वीकारला जातो. उदा. आईन्स्टाइनच्या सामान्य सापेक्षता सिध्दांताने जडवस्तूच्या सान्निध्यात प्रकाशकिरणाचे वक्रीभवन होते असे प्रथम (१९१५साली) भाकित केले

होते. हे भाकित १९१९ साली झालेल्या खग्रास सूर्यग्रहणाच्या नैसर्गिक प्रयोगाच्या वेळी केलेल्या निरीक्षणाने खरे ठरले व तो सिध्दांत शास्त्रीय सत्य म्हणून स्वीकारला गेला. डार्विनचा उत्क्रांतिवादी सिध्दांत कोणतेही भाकित करत नाही. जडातून जीव निर्माण होण्याचे भाकित करणे तर राहोच, पण एकदा निर्माण झालेल्या जीवापासून कोणत्या जीव-जाती निर्माण होतील किंवा जीवजाती निर्माण होतील काय, याचेसुध्दा तो सिध्दांत भाकित करू शकत नाही. मग जैविक प्रगती होईल काय, तिचे पर्यवसान मानवाच्या निर्मितीत होईल काय याचे भाकित करणे दूरच! अशारितीने शास्त्रीयतेच्या कसोटीवर डार्विनचा उत्त्क्रांतिवादी सिध्दांत शास्त्रीय नसल्याचे सिध्द होत असताना तो शास्त्रीय जगात सत्य म्हणून कसा स्वीकारला गेला? त्याला तीन कारणे आहेत. एक, जैविक उत्क्रांती झाल्याचे अनुमानात्मक पुरावे आहेत. म्हणजे उत्क्रांतीची घटना अनुमानाने सत्य ठरते. दोन, काही जीवजाती कालाच्या ओघात नामशेष झाल्याचे भूस्तर शास्त्रीय पुरावे आढळून आले आहेत. त्यामुळे भौतिक परिस्थितीशी ज्या जीवजाती यशस्वीरीत्या सामना करू शकतात त्या त्या टिकतात व प्रजोत्पादन करत वाढतात, असा निष्कर्ष काढता येतो. यालाच डार्विनने नैसर्गिक निवड (natural selection) म्हटले आहे. तिसरे सर्वात महत्वाचे कारण पाश्चात्य भौतिक विज्ञानाच्या यशस्वी प्रगतीमुळे जडवादाला आधुनिक जगात मिळालेली शास्त्रीय प्रतिष्ठा, जी डार्विनच्या उत्क्रांतिवादाला (तो रेणवीय जीव शास्त्रातील-molecular biology - शोधामुळे व त्याच भौतिक वादावर आधारलेला असल्यामुळे) अनायासेच मिळाली. पण याच भौतिक विज्ञानाने २०व्या शतकात शोधलेल्या क्वांटम मेकॅनिक्सच्या सिध्दांतामुळे (जो अध्यात्मवादाचे समर्थन करतो) भौतिक वादाची व त्यावर आधारलेल्या डार्विनवादाची प्रतिष्ठा हल्ली धुळीस मिळाली आहे. पण शास्त्रीय जगात दीर्घकाळ (300 वर्षे) घट्ट पाय रोवून बसलेल्या जडवादी भौतशास्त्रज्ञांना व जीवशास्त्रज्ञांना क्वांटम सिद्धांताचे हे अध्यात्म वैज्ञानिक स्वरूप पचनी पडलेले नाही. त्यामुळे त्या सिध्दांतामुळे भौतिकवादाचा व त्यावर आधारलेल्या डार्विनवादाचा सैद्धांतिक मृत्यू झाल्याचे मान्य करायला ते तयार नाहीत. पण तो मृत्यू घडवून आणणारा क्वांटम सिध्दांत मान्य नाही असे उघडपणे म्हणता येत नसल्यामुळे तो समजत नाही, किंवा अपुरा आहे, असे भौतशास्त्रज्ञ म्हणत आहेत. आईन्स्टाइने

तर त्यात भुताटकीचा संबंध (Spoocky comection) असलेला म्हटले आहे! तो सिध्दांत डार्विननाद खोटा ठरवतो हे तर डार्विनवाद्यांच्या गावीही नाही.कारण ज्या आंधळ्या स्थानिक कार्यकारणातून, म्हणजे अपघाताने पहिला जनुक (जीव) पृथ्वीतलावर निर्माण झाल्याचे ते मानतात, तसेच त्या पहिल्या जनुकातील ज्या (त्याच) आंधळ्या स्थानिक कार्यकारणभावाच्या उत्परिवर्तनातून, म्हणजेच परत अपघाताने, विविध जीवजातीही निर्माण झाल्याचे मानतात, त्या स्थानिक (आंधळया) कार्यकारणभावाचेच भौतिक विज्ञानातून क्वांटम मेकॅनिक्सने सप्रयोग उच्चाटन केले आहे. (हा प्रयोग 'ईपीआर पराडॉक्स' या नावाने भौत विज्ञानात प्रसिध्द आहे.) त्यामुळे पृथ्वीवरील पहिला जीव स्थानिक (आंधळ्या कार्यकारणभावातून म्हणजे अपघाताने निर्माण झालेला नसून भौतिक कार्यकारणभावातून आध्यामिक (चेतनयुक्त) नियमानुसार (आईन्स्टाइनच्या शब्दात भुताटकीच्या संबंधातून!) निर्माण झाला असल्याचे सिध्द होते. तसेच त्याच वैज्ञानिक कार्यकारणभावातून त्या पहिल्या जीवापासून विविध जीवजातीही निर्माण झाल्याचेही सिध्द होते, संपूर्ण विश्व क्वांटम सिद्धांताच्या स्थानिक कार्यकारणभावातून निर्माण झालेले असल्यामुळे विश्वातील कोणत्याही घटनेची उपपत्ती (explaination), ज्यात जैविक उत्क्रांतीच्या घटनेच्या उपपत्तीचा ही समावेश होतो, क्वांटम सिद्धांताच्या वैश्विक (आध्यात्मिक) कार्यकारणभावातूनच देता येणार व समजणार आहे, स्थानिक कार्यकारणभावातून म्हणजे तुकड्या तुकडयाने नाही, जो आंधळा भाव आहे. क्वांटम सिद्धांताचा हा वैश्विक कार्यकारणभाव विश्व एकात्म वा अविभाज्य (अखंड) असल्याचे सांगतो (पाहा: The Undivided Universe-D.Bohm &. J.J.Hiley,1993) विश्वाचा हा अविभाज्य वा एकात्म भाव म्हणजेच विश्व ईश्वरस्वरूप असल्याचा भाव होय. याच ईश्वररूप एकात्म विश्वाकडे ज्ञानेश्वरांनी 'आता विश्वात्मके देवे' असे म्हणून व 'येणे वाग्यज्ञे तोषावे' अशी आळवणी करून, पसायदान मागितले आहे. अशारितीने क्वांटम सिध्दांतानुसार विश्व चेतनयुक्त आहे. आंधळे वा जड नाही. अर्थात अव्यक्त स्वरूपात. व्यक्त स्वरूपात मात्र ते जड वा आंधळे असल्याचे दिसते. पण ते त्याचे खरे स्वरूप नव्हे. ते त्याचे खरे स्वरूप असते तर उत्क्रांतीच झाली नसती. म्हणजे जैविक प्रगती झाली नसती. मानव निर्माण झाला

नसता. जैविक उत्क्रांती व मानवाची निर्मिती हा विश्व व त्याचे नियम आंधळे नसल्याचा, चेतन असल्याचा पुरावा आहे. किंबहुना ते नियम सहेतुक (perposive) असल्याचा पुरावा आहे. (वैश्विक नियम कसे सहेतुक आहेत, मानवाची निर्मिली व्हावी याचसाठी कसे आहेत हे आपण मानवी वैश्विक तत्वाच्या-Anthropic Cosmological Principle - शोधातून सिध्द होत असल्याचे तिसऱ्या लेखात पाहिले आहे. ते नियम आंधळे असल्याची डार्विननाद्यांची समजूत होण्याचे कारण जनुकातील उत्परिवर्तने क्वचित् प्रसंगी अपायकारक (deleterious ) असतात; प्रजोत्पादन(reduplication) करणाऱ्या डी.एन.ए.च्या (कॉपी करण्याच्या) प्रक्रियेमध्ये क्वचित् चुका होतात, म्हणून ही प्रक्रिया आंधळी आहे, असा डार्विनवाद्यांचा समज झालेला आहे पण त्यांचा हा समज चुकीचा आहे. माणूस चुका करतो म्हणून तो आंधळा आहे असे आपण म्हणतो काय? वास्तविक सूक्ष्म पातळीवरील निसर्गात्मांचे, कर्म देवतांचे अदृश्य स्वरूपात राहून केलेले प्रयोग




असतात. अशा प्रयोगातूनच शारीरिक दोष निर्माण करून माणसाला त्याच्या कर्माचे फळ ते देत असतात. आनुवंशिक दोष, कॅन्सर ही त्याची काही उदाहरणे. साथीचे रोग निर्माण करणारे जीवाणू व विषाणू (उदा - प्लेग, कॉलरा, फल्यू, सार्स, कोरोना इ. हे अशाच प्रयोगांची फलिते आहेत. कर्मदेवता व निसर्गात्मे अदृश्य स्वरूपात राहून हे कार्य करत असतात. अदृश्य स्वरूपात राहून हे कार्य ते कसे करतात याची झलक मॅडम ब्लेव्हेटस्की, पांडीचेरीच्या माताजी (मदर)

यांच्या बाबतीत घडलेल्या घटनांवरून पाहायला येईल. (या घटनांची माहिती माझ्या ‘विज्ञान आणि चमत्कार' या ग्रंयाच्या पृ.३४८-९ वर व ‘चमत्कारांचे विज्ञान’ या ग्रंथाच्या पृष्ठ १४६-७ वर दिली आहे) ती थोडक्यात अशी: एकदा ब्लॅव्हेट्स्की टॉवेलसाठी आणलेल्या कापडाचे काठ दुमडून शिवत होत्या,पण ते काम कंटाळवाणे वाटल्यामुळे ऑलकॉट यांच्या सूचनेकरून त्यांनी एका निसर्गात्म्याला आज्ञा करून ते कापड, सुई-दोरा एका कपाटात ठेवून दिले व त्याला कुलुप लावले. काही वेळाने कुलूप काढून पाहिले तेव्हा त्या निसर्गात्म्याने ते अदृश्य रीतीने व्यवस्थित शिवून ठेवलेले आढळले! तसेच पॉडीचेरीच्या मदर एकदा अरविंद व एक पाहुणा यांच्या बरोबर बाहेरच्या खोलीत बोलत राहिल्या असता स्वयंपाक घरात तापायला ठेवलेले दूध उतू जाण्याच्या बेतात असल्याचे एका निसर्ग आत्म्याने त्यांचा पदर ओढून अदृश्य स्वरूपात सुचवले होते. (त्या काळी मी साडी नेसत होते,असे त्या म्हणतात.) वैश्विक आत्म्याच्या (ईश्वराच्या) अधिपत्या खालील कर्मदेवतांच्या व असंख्य निसर्गात्मांच्या या अदृश्य स्वरूपातील कार्यालाच ब्लेव्हेटस्की यांनी आत्मायुक्त वा चैतन्ययुक्त नियम म्हटले आहे. क्वांटम सिद्धांताच्या वैश्विक (ईश्वरीय) कार्यकारणभावातून ही आत्मायुक्त नियमांची वस्तुस्थिती हल्ली सप्रयोग, म्हणजे भौतशास्त्रीय कसोटीवर सिध्द झाली आहे. विसाव्या शतकातील क्वांटम सिद्धांताच्या या शोधाचे भाकित लॅव्हेटस्की यांनी एकोणिसाव्या शतकातच केले होते.

उदा.१८८ साली लिहिलेल्या The Secret Doctrine या ग्रंथात त्या म्हणतात,

“ Science will someday have to give up .. such monstrous ideas as her physical self-guiding laws void of soul and spirit....

For all their (science's) wonderful discoveries Will... remain for ever headless bodies unless they lift their eyes to see beyond." (S.D. vol. I pp. 506, 610) अर्थः“ एक दिवस असा येईल की जेंव्हा आत्मा व चैतन्य नसलेल्या आपल्या स्वयंचलित जड ( भौतिक) नियमांची राक्षसी (विद्रूप) कल्पना विज्ञानाला टाकून द्यावी लागेल... विज्ञान जडाच्या पलीकडे आपली दृष्टी नेऊन पाहणार नसेल तर त्याचे सर्व आश्चर्यकारक शोध हे कायमचे शिर नसलेले

घडच राहणार आहेत." डार्विनवादी सिद्धांताच्या या चेतनरूपी शिर नसलेल्या व निर्जीव घडालाच जिवंत शरीर म्हणून हल्ली नवडार्विनवादी कवटाळून बसले आहेत! डार्विनवादाचा मृत्यू क्वांटम सिध्दांतामुळे झालेला आहे, हे त्यांच्या गावीच नाही.

मी लेखाच्या प्रारंभी म्हटले आहे की भौतिकवादी शास्त्रज्ञांना माणसाचा जन्म कुठून होतो, का होतो, तो माणूस जन्म घेण्यापूर्वी कुठे होता. इ. प्रश्नांची उत्तरे जड नियमानुसार देता येत नाहीत. ती उत्तरे जड नियमानुसार का देता येत नाहीत, हे जडवादावर आधारलेल्या व हल्ली भौतिक विज्ञानजगात रूढ बनलेल्या डार्विनच्या उत्क्रातिवादी सिद्धांताचे उदाहरण घेऊन या लेखात स्पष्ट केले आहे. क्वांटम सिध्दांत समर्थन करीत असलेल्या आध्यात्मिक नियमानुसार - ज्या नियमांच्या अंतर्गत पुनर्जन्माचा सिध्दांत येतो, त्यानुसार- ती देता येतात काय, हे आला आपल्याला पाहावयाचे आहे. हे पुढील लेखातून पाहू.

टीपःडोळ्याची जी निर्मिती नैसर्गिक निवडीने (जी निवड जड वा आंधळी आहे. असे समजले जाते) झाली असे समजणे हा कमालीचा मूर्खपणा आहे, असे डार्विनने म्हटले आहे, ती डोळ्याची निर्मिती ४०वेळा झाली आहे असे डार्विनवादी हल्ली म्हणत आहेत! इतक्या वेळा डोळ्याची निर्मिती झालेली असेल, तर अपघाताने म्हणजे डार्विनच्या जड, आंधळ्या कार्यकारणभावाने, होणे शक्य नाही, हे उघड आहे. जड आंधळे नियम टाकून देण्याचा काळ एक दिवस येईल, हे ब्लॅव्हेटस्की यांचे भाकित क्वांटम सिद्धांताच्या शोधातून भौतशास्त्रज्ञांनी खरे ठरविले आहेच; पण नवडार्विनवादी देखील वरील शोधातून (तो शोध खरा असेल तर) ते भाकित खरे ठरवीत आहेत! पण अज्ञानातून! कारण नैसर्गिक निवडीनेच, म्हणजे आंधळ्या नियमरुपी अपघातातूनच ४० वेळा डोळयाची निर्मिती झाली, असे ते समजतात.

(क्रमशः)

============================================================